गोदाम दुरूस्तीच्या कामासाठी प्रशासकीय मान्यता देण्याबाबत _सन २०१४-१५ (५ प्रस्ताव)

महाराष्ट्र शासन
अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग
शासन निर्णय क्रमांकः गोदादु-१११४/प्र.क्र.८३४/नापु-१६-ब
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०००३२.
तारीख: ४ सप्टेंबर, २०१४

प्रस्तावना

सार्वजनिक वितरण व्यवस्थेअंतर्गत राज्यातील शिधापत्रिका धारकांना जीवनावश्यक वस्तुंचे वितरण करण्यात येते. भारतीय अन्न महामंडळाकडून प्राप्त होणाऱ्या अन्नधान्याची साठवणूक राज्य शासनाच्या गोदामामध्ये केली जाते. राज्यातील शासकीय गोदाम दुरुस्तीचे प्रस्ताव प्राप्त झाले असून सदर अंदाजपत्रके रु.१० लक्षपेक्षा कमी रक्कमेची असल्यामुळे वित्त विभागाच्या वित्तीय अधिकारामध्ये सुधारणा करण्यासंदर्भात शासन निर्णय वित्त विभाग क्र.विअप्र-१००८/प्र.क्र.७०/२००८/विनियम दिनांक १५/५/२००९ च्या शासन निर्णयातील भाग-२ उपविभाग-५, अ.क्र.३ व सा.बां. नियम पुस्तिकेतील परिच्छेद क्र.१३४ नुसार किरकोळ व नागरी बांधकामांना (विद्युत) रु.१० लक्ष रक्कमेपर्यंतच्या कामांना प्रशासकीय मान्यता देण्याबाबतचे अधिकार विभाग प्रमुखांना आहेत. सबब,जालना व लातुर जिल्हयातील गोदामांच्या दुरुस्तीच्या प्रस्तावांस प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय

राज्यातील जालना जिल्हयातील ४ तसेच लातुर जिल्ह्यातील एका कामास व अंदाजपत्रकास व कामांना पुढील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

अ) गोदामाचा नकाशा, संकल्पन व साईट प्लॉन सक्षम अधिकाऱ्यांकडून मंजूर करून घेतल्याशिवाय कामाला सुरूवात करू नये.

ब) प्रथमता सार्वजनिक बांधकाम विभागाच्या सक्षम अधिकाऱ्यांकडून अंदाजपत्रके साक्षांकित करून घ्यावीत.

३. गोदाम दुरूस्तीचे प्रस्ताव-

| अ.क्र. | जिल्हा | तालुका | गोदामाचे नाव | कामाचे सर्वसाधारण स्वरुप | अंदाजित खर्च (रु.) |
|---|---|---|---|---|---|
| १ | जालना | भोकरदन | भोकरदन गोदाम क्र. १ | अंतर्गत सिमेंट कॉक्रीट रस्ते बनविणे इ. (अंदाजपत्रकानुसार) | ९,९६,२८३ |
| २ | जालना | भोंकरदन | भोकरदन गोदाम क्र.२ | गोदाम क्रमांक-१ व २ छत दुरूस्ती इ.(अंदाजपत्रकानुसार) | ९,९५,९२८ |
| ३ | जालना | जाफ्राबाद | गोदाम क्र. १ | गोदाम क्रमांक-१ अंतर्गत सिमेंट कॉक्रीट रस्ते बनविणे इ.(अंदाजपत्रकानुसार) | ९,९४,०२६ |
| ४ | जालना | जाफ्राबाद | गोदाम क्र. २ | गोदाम क्रमांक-२ अंतर्गत सिमेंट कॉक्रीट रस्ते बनविणे इ.(अंदाजपत्रकानुसार) | ९,१२,९१३ |
| ५ | लातुर | शिरुर अनंतपाळ | शिरुर अनंतपाळ | गोदाम किपर व वॉचमनसाठी रुम बांधणे इ.(अंदाजपत्रकानुसार) | ७,००,००० |
| | | | | एकूण रु. | ४५,९९,१५० |
| | | | एकूण रु पंचेचाळीस लक्ष नव्यांन्नव हजार एकशे पन्नास फक्त. | | |

४. सदरील शासकीय गोदाम दुरूस्तीची कामे पूर्ण होताच त्याबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करण्याची दक्षता जिल्हा पुरवठा अधिकारी यांनी घ्यावी.

५. दुरूस्तीस विलंब किंवा इतर कारणांनी गोदाम दुरूस्तीस वाढीव खर्च होणार नाही, याबाबत जिल्हा पुरवठा अधिकारी यांनी दक्षता घ्यावी.

६. सदरील गोदाम दुरूस्तीची कामे सार्वजनिक बांधकाम विभागामार्फत करण्यात यावीत. त्याकरीता आवश्यक निधी सार्वजनिक बांधकाम विभागास उपलब्ध करून देण्यात येईल.

७. वरीलप्रमाणे प्रशासकीय मान्यता प्राप्त झालेल्या शासकीय गोदाम दुरूस्तीकरीता वित्त विभागाकडून निधी उपलब्ध झाल्यांनतर त्याप्रमाणे दुरूस्तीचे काम करण्यात यावे. निधी प्राप्त झाल्यानंतर शासकीय गोदाम दुरूस्तीची कामे तातडीने सुरू करण्यात येऊन पूर्ण करण्यात यावीत. गोदाम दुरूस्ती सुरू झाल्यांनतर प्रथम

दुरूस्तीचा संपूर्ण तपशिल तसेच संबंधित दुरूस्तीचा दरमहा आढावा घेऊन दुरूस्तीची प्रगती जिल्हा पुरवठा अधिकारी यांनी शासनास सादर करावी.

८. सदरील कामावरील खर्च सन २०१४-१५ या वित्तीय वर्षात व तदनंतर वेळोवेळी उपलब्ध होणाऱ्या अनुदानातून करण्यात यावा. सदर गोदामाच्या दुरूस्तीवरील खर्च मागणी "मागणी क्रमांक एम-०२, लेखाशिर्ष २४०८ अन्न साठवण व वखार साठवण यावरील भांडवली खर्च , ०१, अन्न १०१, प्रापण व पुरवठा (०३), प्रापण वितरण व किंमत वितरण ०३, ०२ ( मुफसल ) २४०८ ०१०८ २७ लहान बांधकामे" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

९. सदर गोदामाच्या दुरूस्तीचे काम पूर्ण झाल्यानंतर सदरचे काम हे मंजूर अंदाजपत्रकाप्रमाणे उत्कृष्ट झाल्याबाबतची खातरजमा संबंधीत कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग व जिल्हा पुरवठा अधिकारी यांनी संयुक्तरित्या करून तसा स्थल निरिक्षण अहवाल तयार करावा व तो अभिलेखामध्ये जतन करून ठेवावा.

१०. प्रशासकीय मान्यतेच्या आदेशात कामाचे संक्षिप्त स्वरूप नमूद करण्यात आलेले असून प्रत्यक्षात गोदाम दुरूस्तीची कामे शासनास सादर केलेल्या दुरूस्ती कामांच्या अंदाजपत्रकानुसारच पूर्ण करण्यात यावीत. म्हणजेच शासनास सादर केलेल्या अंदाजपत्रकात समाविष्ट बाबीनुसार गोदाम दुरूस्तीची कामे पूर्ण करण्यात यावीत.

११. गोदाम दुरूस्तीच्या कामातील अनावश्यक पुनरूक्ती टाळण्याच्या दृष्टीने सदरहू आदेशात नमूद गोदाम दुरूस्तीच्या कामाच्या आवश्यकतेबाबत जिल्हा पुरवठा अधिकाऱ्यांनी व्यक्तिश: छाननी करावी. गोदाम दुरूस्तीच्या कामातील पुनरूक्ती अथवा विसंगतीबाबत शासनास अवगत करावे. यासंदर्भात पुढील शासन आदेशापर्यंत कार्यवाही स्थगित करावी.

१२. वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ च्या भाग-१ उप भाग-५ मधील अनुक्रमांक ३ नुसार महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परिच्छेद क्रमांक १३४ नुसार प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय

अधिकारानुसार व सार्वजनिक बांधकाम विभागाच्या दिलेल्या अभिप्रायानुसार सदरचा आदेश निर्गमित करण्यात येत आहे.

१३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०९०५१२००२६०८०६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ganesh Nivrutti Pawar

Digitally signed by Ganesh Nivrutti Pawar
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=FCSCP, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Ganesh Nivrutti Pawar
Date: 2014.09.05 11:58:25 +05'30'

**( गणेश नि.पवार)**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) उप आयुक्त (पुरवठा) औरंगाबाद.

२) वित्तीय सल्लागार व उपसचिव कार्यालय, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई.

३) जिल्हाधिकारी/जिल्हा पुरवठा अधिकारी , जालना,लातुर.

४) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, जालना,लातुर.

५) जिल्हा कोषागार अधिकारी, जालना,लातुर.

६) महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा), मुंबई/ नागपूर.

७) महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर.

८) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई (वित्तीय सल्लागार व उपसचिव मार्फत)

९) वित्त विभाग (व्यय-४, अर्थोपाय व अर्थसंकल्प-३), मंत्रालय, मुंबई.

१०) नियोजन विभाग (का-१४११), मंत्रालय, मुंबई.

११) सहाय्यक संचालक (संगणक), लेखा व कोषागारे, मुंबई/नागपूर.

१२) निवड नस्ती/नापु-१६ब